# एबा कोच यांच्या ‘दि कंप्लीट ताज महाल’ या ग्रंथाचा परिचय

# E Book 52

भाग १




एबा कोच (उच्चाराप्रमाणे ईबा कोह)

## ❖ प्रस्तावना

❖ हा ग्रंथ काही काळापासून माझ्या संग्रहात होता. तो मागवल्यावर त्याच्या नोट्स काढून त्यावर एक Comparative study of Books by Ebba Koch and Late P. N. Oak या शीर्षकाचा निबंध लिहायचे हाती घेतले होते. नंतर काही ना काही कारणाने ते लेखन मागे पडले. आता ते लेखनही सुरु ठेवून मराठीत काही लिहून सादर करावे आणि वाचकांच्या प्रतिक्रियांचा कानोसा घ्यावा असे वाटून हे लिखाण सादर करत आहे.

❖ कै. ओकांचे ताजमहाल विषयावर विचार आजपर्यंत जनमानसात पसरले आहेत. या ठिकाणी कॅप्टन पु.ना. ओक ह्यांच्या 'नेताजींचे सहवासात' या पुस्तकाचा परिचय करून दिल्याने त्यांच्या व्यक्तिमत्वाचे काही पैलू आपण आधी वाचले आहेत. त्यांच्या म्हणण्याबाबत ईबा कोह यांच्या ग्रंथातून त्याबद्दल काय वाचायला मिळते याचा परामर्ष घ्यावा असा मानस आहे. शक्यतो मध्यम मार्ग स्वीकारून लेखन करायचा प्रयत्न आहे. मी पुनांचा पुतण्या म्हणून माझ्या कडून काही ठिकाणी त्यांचे म्हणणे जास्त ठळकपणे दाखवले गेले तर तो दोष माझा आहे.

❖ सामान्यपणे खालील बिंदू कै ओकांच्या म्हणण्यातून ठळकपणे दिसतात-
१. कळसाचा आकार व त्यातील भाग -
२. ॐ भासेल अशी फुलाच्या पाकळ्यांची रचना
३. कार्बन १४ कसोटीतून समोर येणारे निष्कर्ष

यावर लेखन करण्याआधी या ग्रंथाची सामान्य माहिती देतो. २८८पानाच्या पुस्तकात ५० हजारातून निवडलेले ३७७ फोटो व आकृत्या आहे. मजकूर २००५ सालापर्यंतचा ताजा आहे. लेखिका व्हिएन्ना, ऑस्ट्रिया देशातील अभ्यासक आहेत. गेल्या १९९५ ते २००५ या १० काळात त्यांनी ताजमहालाच्या प्रत्येक भागाचा सर्वांगाने अभ्यास केलेला आहे. त्या भारतीय पुरातत्व खात्यात ताजमहालाच्या सल्लागार समितीवर होत्या. त्यांना Aga Khan Program for Islamic Architecture, Harvard येथील व्हिजिटिंग फेलोशिप मिळाली आहे. यावरून आपण समजून घ्या.

त्यांच्या लेखनातून इतर काय म्हणतात ते बरोबर किंवा चूक असा पवित्रा नाही. काही ठिकाणी सौम्य भाषेत त्यांनी आपले मत दर्शवले आहे. भारतातील गचाळपणा त्यांनी एके ठिकाणी मजेने दाखवताना म्हटले आहे की विदेशी पर्यटकांना एटीएममधून पैसे काढायची आधुनिक सुविधा जिथे एका बाजूला आहे त्याच्या शेजारी गाई-म्हशींचे फदफदे टाळत तिथे पोहोचावे लागते!
माझ्या जवळचा ग्रंथ 2006 सालचा थेम्स अँड हडसन .कॉम चे प्रकाशन आहे. अमेझॉनवरून मागवता येते किंमत £24.95 आहे.

**१. कळसाचा आकार आणि त्यातील भाग -**

कळस म्हणजे काय? त्याचे महत्व हे लेखिकाला माहिती आहे. पान १६७ वर त्या म्हणतात, "ताज महलाच्या विशिष्ठ भागा(मधील) नंदनवन प्रतीकांमध्ये फुलांच्या फुलदाण्यांवर एक विशेष भर दिला आहे. त्यांचा (त्या काळातील वास्तू विशारदांचा) युरोपियन फॉर्म (मधे) भारतीय वास्तुकलेच्या प्राचीन प्रतीकांचा उपयोग (पूर्ण-घट) तांब्यातून बाहेर पडणाऱ्या पानातून, समृद्धीचे आणि कल्याणचे प्रतीक (दर्शवले जाते) त्याचा कोपरे सुत बनवण्यासाठी शाहजहानी पद्धतीला (वास्तूकलेच्या नव्याने ) अर्थरूपी करायला वापरला केला गेला आहे. फोटो ३४७ वरील भाष्याचे थोडेसे स्वैर रुपांतर;



मूळ लिखाण असे आहे - या पेक्षा अर्थवाही रुपांतर कोणाला सुचवायचे असेल तर स्वागत आहे. "The flower vases set a special accent in the Paradise symbolism of the hall. Their Europeanizing form is used for an elegant Shahjahani reinterpretation of an ancient symbol of Indian architecture, the pot with overhanging leaves (purna-ghata), which symbolizes prosperity and wellbeing [347];"

या सोबतचा फोटो -

फक्त कळसाचा फोटो कुठेही दिसत नाही. त्या कळसाची एक प्रतिकृती तिथे जमिनीवर मुद्दाम तयार करून ठेवलेली दिसते.

त्या मेहमानखाना म्हणजे ताजमहालाकडे तोंड केले तर उजव्या हाताला दिसते ती वास्तू. डाव्या हाताच्या वास्तूला मशीद आहे. कधी तिला सवाल म्हणतात उजव्या बाजूच्या वास्तूला साहजिकच जबाब असेही म्हणतात.


er hall D: finial image of Taj mausoleum

ती प्रतिकृती जवळून अशी दिसेल पण एका बुरुजावरून, दुरून तो पान १८३ वरील, फोटो क्र. २६३ पाहा.



हा कोच बाईंच्या पुस्तकातील फोटो जुना आहे. सध्या या आकृतीला रेलिंग बांधून बंदिस्त केले आहे.

कै पुना ओकांच्या पुस्तकातील चित्रे कृष्ण धवल होती. ती नंतरच्या काळात रंगीत व अधिक जवळून काढली गेली आहेत. त्यामुळे त्यांचा वापर करून कलश

अगदी जवळून कसा दिसतो तो दाखवला आहे.



सत्यनारायणाच्या पूजेत मांडतात तसा तांब्या त्यावर अंब्याच्या पानांवर नारळ ठेवलेला असे भारतियांच्या मनाला भावेल असे चित्र या कलशाच्या चित्रातून दिसते. आधिक जवळून पाहिले तर त्या वर काही अरेबिक मधे लिहिलेले दिसते. ते उठावदार Emboss केलेला तो शब्द आहे. याबाबत फारसे बोलले जात नाही.

# अल्लाह

पर्शियन लिपीत

अरेबिक लिपीत

## २. ॐ भासेल अशी फुलाच्या पाकळ्यांची रचना -




ओकांनी ॐ असे वर्णलेला ईवा कोह यांनी फोटो क्र. ३४३ पान २२१ वर त्याला म्हटले आहे, “Flower type X (With bending stalks (देठ) supporting pair of blossoms (फुले)except at the top where one of each pair left out so as to create reverse (उलटवलेली) symmetry (प्रमाणबद्धता) on the Dado (जमिनीलगतची भिंतीवरची पट्टी )in one of the cruciform rooms (समोरासमोरच्या समानांतर खोल्या)”. (Photograph taken in 1997) या फुलाचे नाव काय ते कै ओक सांगताना दिसत नाहीत. पण ते लिलीच असावे.



लिलीचे फूल कसे दिसते ते विकीपेडियावर पहा

ईबा कोह लाल फुलांच्या फोटोतील मजकुरात म्हणतात, “ Martagon lily painted by Mansur, Mighsl, c.1620. This is possibly the earliest botanical illustration tulip linifolia regel, which grows in central Asia and the western Himalayas. It is characterised a undulating (डुलणारी) leaves and broad (पाकळ्या) petals, abruptly contracting to a fine point, which curl back (फुलाच्या पानांची टोके आत वळलेली) and are a glowing red.”

फोटोत निरखुन पाहिल्यास इनसेट मधे मी खाली मान घातलेल्या फुलाला डावीकडे तोंड करून दाखवल्यावर ॐ त्यातून ही दिसू शकतो असे भासते. इथला ॐ किंवा नागाच्या जोड्या, गणेशाचे रुप वगैरे दृष्टीभ्रम Optical illusions आहेत. मानले तर ॐ आहे नाही तर फक्त फुलाची आकृती आहे. नाग जोड्या, गणेशावर पुढील भागात भाष्य केले आहे. लिली हे फूल अनेक रुपात विविध रंगातील छटातून असते. कमळ हा एक प्रकारच्या लिलीचा प्रकार असावा.

**३. कार्बन १४ कसोटीतून समोर येणारे निष्कर्ष -**

(१९७४ साली मार्विन मिल्स या अमेरिकन तज्ज्ञाने आपणहून आग्र्याला जाऊन यमुनेच्या पात्राकडे असलेल्या संरक्षक भितीतील एक लाकडी दरवाज्याच्या भागातील काही इंचाचा तुकडा परीक्षणासाठी काढून नेला होता. नंतर त्यांच्या निष्कर्षातुन १३५९ ± ८९ असा काळ असावा असा निष्कर्ष काढला होता.) कै. ओकांनी ते आपल्या पुस्तकात नमूद केले. ("The date came to 1359 AD with a spread of 89 years on either side and 67% probability, Masca corrected.")

या विषयावर वेगळा भाग सादर आहे..

ईबा कोह यांच्या ग्रंथात कार्बन कसोटीचा उल्लेख आजिबात केलेला नाही. मग मार्विन मिल्स यांचा संदर्भ बिबलिओग्राफीत येणार कसे?

(जाता जाता - नाडीग्रंथांच्या संदर्भात ताडपट्टीची कार्बन कसोटी करायला मी मिल्स त्यांना विनंती केली होती. पण तोवर जर्मनीत ती कसोटी झाल्याचे समजल्यावर मी ती बाब पुढे रेटली नव्हती.)

ताजा कलम (२०२४मधे जोडले- पुन्हा कोणी असे लाकडी दरवाज्याचे तुकडे काढून जाऊ नयेत म्हणून कदाचित तो दरवाजा काढून टाकला गेला असे मानले तर ती परवानगी कोणी दिली कोणी त्या कामाचे कंत्राट घेतले त्याची बिले  व तारीख मिळवून तो दरवाजा कुठे लपवला किंवा नष्ट केला याचा तपशील त्या काळातील सरकारी नोकर, कामगार जे आता निवृत जीवन जगत आहेत ते पुढे येऊन यावर प्रकाश टाकू शकतील. नोकरीतील बढती थांबेल, दूर पोस्टींग, बडतर्फी वगैरे ताण आता त्यांच्यावर नसल्याने सध्याच्या खुल्या वातावरणात त्यांना बोलते करायला समाज माध्यमांनी पुढाकार घेतला पाहिजे.)

आता तर तो दरवाजा विटांच्या भिंतीने बंद केला आहे.




पुढे चालू... भाग